ठेंच वर्णन नाहीं "पुराकल्पे तु नारीणां मौंजी-बन्धनमिष्यते " असें एक वचन मनूचें प्रसिद्ध आहे पण हा प्रकार भारती काळांत चालू असल्याचें महाभारतांत कोठें वर्णन नाहीं. त्यांचें शिक्षण म्हणजे साधारण लिहिणें वाचणें व धार्मिक गोष्टी व विचार सांगणें किंवा कांहीं पाठ म्हणून घेणें एवढेंच असावें. स्त्रिया सहधर्मचारिणी म्हणजे नवऱ्याबरोबर वैदिक क्रियांच्या अधिकारी होत्या; परंतु वेदविद्या शिकलेल्या नव्हत्या. त्यांनीं वैदिक क्रिया स्वतंत्र केल्याचें महाभारतांत वर्णन नाहीं.

साधारण लिहिणें वाचणें व धर्म यांचें शिक्षण दिलें जात असून क्षत्रिय स्त्रियांना ललितकलांचेंही शिक्षण महाभारतकाळीं देत असत ही गोष्ट विराट पर्वांतील हकीकतविरून दिसते. विराटकन्या उत्तरा हिला गीत, नृत्य व वादित्र शिकविण्याकरितां बृहन्नडेस ठेविलें होतें; या वर्णनावरून प्राचीनकाळीं क्षत्रिय स्त्रियास गीत-नृत्य शिकवीत असत. हल्लीं गीत-नृत्य स्त्रियांस शिकविणें निंद्य मानलें जातें, परंतु महाभारत काळीं तें क्षत्रिय कन्यकांस शिकवीत असत. तें शिकविण्यासाठीं विराटाच्या राजवाड्यांत निराळी नृत्यशाळाही बांधली होती असें वर्णन आहे. नृत्य शिकविण्यासाठी विस्तीर्ण जागा पाहिजे हें उघड आहे, तेव्हां असें शिक्षण देणें श्रीमंत लोकांसच शक्य होतें. हें शिक्षण कुमारिकांना देत असत आणि त्याच्या विशेष गुणांपैकीं लग्नाच्या वेळीं हाही एक गुण मान्य केला जात असावा. उत्तरेबरोबर राजवाड्यांतील व बाहेरील ाणखी कुमारिका शिकत होत्या असें वर्णन आहे. 'सुताश्च मे नर्तय याश्च तादृशीः । कुमारी-पुरमुत्ससर्ज तम् ' या वाक्यावरून हें अविवाहित मुलींचें शिक्षण असलें पाहिजे. स्त्रियांना कुमारीदशेंतच शिक्षण देणें योग्य आहे व स्त्रियांना कुमारीदशेंतच शिक्षण देण्याचा सांप्रदाय त्या वेळीं असला पाहिजे. लग्न झाल्यानंतर त्या संसारांत ताबडतोब पडत, तेव्हां शिक्षणाचा वेळ कुमारीदशेंतच होता. स्त्रियांना ब्रह्मचर्याश्रम नव्हता आणि गुरुगृहीं वासही नव्हता. पण त्यांचें शिक्षण पित्याच्या गृहीं शिक्षकाकडून होत असे असें वरील वर्णनावरून दिसतें व हें शिक्षण मुख्यतः ललितकलांचें होतें. त्यांत नृत्यगीतवादित्र हे विषय विशेषतः क्षत्रियकन्यकांचे असत. नृत्यशाळेंत शिक्षण मिळालेल्या मुली आपल्या घरोघर जातात व रात्रीं नृत्यशाळा शून्य असते असें वर्णन " दिवात्र कन्या नृत्यन्ति रात्रौ यान्ति यथागृहं" (वि० अ० २२ ) आहे. तेव्हां बाहेरच्याही मुली शिकण्यास येत परंतु तेथें राहत नसत हें उघड आहे.

नृत्यगीत शिकविण्यास बृहन्नडेला विराटानें ठेविलें यावरून स्त्रियांना म्हणजे मुलींना हे विषय शिकविण्यास पुरुष ठेवीत नसत असा अंदाज होतो. बृहन्नडेला शिक्षण देण्यास ठेविलें हें ी आश्चर्य करण्यासारखें आहे. कारण हिजडे लोक सर्वतोपरी व्यवहारांत त्याज्य आहेत असें मत नेहमीं असलेलें दिसतें. बृहन्नडा हा पुरुष नसून क्लीब आहे अशीही परीक्षा विराटानें केल्याचें वर्णन आहे. तो खोजा नव्हता हेंही यावरूच उघड आहे. किंबहुना, अन्यत्र वर्णिलेल्याप्रमाणें खोजा बनविण्याची दुष्ट व निंद्य चाल भारती आर्यांत कधींच नव्हती, निदान महाभारतकाळापर्यंत नव्हती. प्राचीन बाबिलोनियन, असिरियन, पर्शियन वगैरे लोकांत ती असून भारती आर्यांत ती नव्हती व अजूनही त्यांत नाहीं हें त्यांस भूषणावह आहे. असो, बृहन्नडा क्लीब आहे अशी परीक्षा करून विराटानें त्यास कुमारींस नृत्य शिकविण्यास अन्तःपुरांत पाठविलें या वर्णनांत

महाभारतकाळीं मुलींस नृत्य शिकविण्यासाठीं क्लीबांचीच योजना करीत असें प्रथम दिसतें. परंतु कालिदासाच्या मालविकाग्निमित्र नाटकावरून तसेंही दिसत नाहीं. मालविकेस नृत्य शिकविणारे दोघे आचार्य गणदास व हरदास हे क्लीब होते असें वर्णन नाहीं; तेव्हां हें एक गूढच आहे स्त्रियांस नृत्य शिकविण्यास किंवा गाणें शिकविण्यास स्त्रियांचा उपयोग कोठेंच करीत नाहींत हेंही एक दुसरें गूढ आहे. पाश्चात्य देशांतही स्त्रियांस नृत्यगीत शिकविलें जातें; पण तें शिकविणारे पुरुषच असतात. असो. अर्जुन सुदृढ, सुस्वरूप व तरणाताठा असा दिसत असल्यानें तो स्त्रियाचे अलंकार घालून क्लीबवेषानें आलेला खरोखर क्लीबच आहे कीं नाहीं याची परीक्षा विराटानें करविली असाच येथें गर्भितार्थ घेतला पाहिजे असें आमचें मत आहे. कुमारिकांना नृत्यगानादि कला शिकविण्यास पोक्त वयाचे पुरुषशिक्षकच सामान्यतः ठेवीत असावेत असें दिसतें. असो. असें शिक्षण सामान्य स्त्रियांना देणें शक्य नाहीं हें उघड आहे. स्त्रियांना पुरुषांप्रमाणें शिक्षण अवश्य आहे असा कटाक्ष नव्हता. पुरुषांना ज्याप्रमाणें गुरुगृहीं जाऊन शिकलेंच पाहिजे असा नियम होता त्याप्रमाणें स्त्रियांना नियम नव्हता. यामुळें सामान्य स्थितींतील स्त्रिया एकंदरीनें अशिक्षित असाव्या असें दिसतें. ब्राह्मणक्षत्रियांच्या मुली महज मिळणाऱ्या शिक्षणानें अधिक सुशिक्षित असाव्या मात्र क्षत्रिय मुलीस ललित कला शिकविण्यास त्यांच्या घरीं शिक्षक ठेवीत असत. याप्रमाणें महाभारतकाळीं स्त्रीशिक्षणाची परिस्थिति होती असें आपल्यास एकंदरीनें म्हणतां येतें.